# साहित्य साधना

कवी - आनंद हिरालाल जाधव

नवसाहित्यकार प्रकाशन, नान्देड
www.navsahitykarpublication.com

पुस्तक – साहित्य साधना
लेखक : – आनंद हिरालाल जाधव
ISBN-NO. : 978-81-956110-1-0

प्रकाशन / प्रकाशक
डॉ.सुनील जाधव
नव साहित्यकार पब्लिकेशन,
महाराणा प्रताप हाउसिंग सोसाइटी.
हनुमान गढ़ कमान के सामने,
नांदेड–महाराष्ट्र–439605
मो.9405384672
www.navsahitykarpublication.com

मुद्रण–
तन्मय प्रिंटर्स,नांदेड
डॉ.सुनील जाधव,नांदेड


मूल्यः–100
संस्करण–प्रथम
प्रकाशन वर्ष– 2022

# ऋणनिर्देश

मराठी साहित्य क्षेत्रातील माझे प्रथम कविता संग्रह ''साहित्य साधना'' याचे लोकार्पन करतांना मला आज खुप हर्ष होत असुन ही काव्य कृति लिहित असताना मला माझे वडील श्री. हिरालाल जाधव (माजी बी.ई.ओ.) माझी आई सौ. भारतीबाई यांचे आशिर्वाद आणि मार्गदर्शन लाभले तसेच माझ्या सर्व गुरूजनांचे शुभाशिर्वाद माझ्या सोबत होते. त्याच बरोबर माझी सुविद्य पत्नी विद्या माझा मुलगा अर्णव, मुलगी रितिका यांनी वेळोवेळी मला प्रोत्साहित करूण मार्गदर्शन तसेच सहकार्य केले. त्याबद्यल मी त्यांचे मनस्वी ऋण व्यक्त करतो.

माझ्या कविता संग्रहास प्रास्ताविक लिहुन देऊन मला मार्गदर्शन करणारे कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेचे अध्यक्ष प्रा. डॉ. भालचंद शिंदे सर यांचा मी सदैव ऋणी राहुण त्यांचे मनस्वी आभार मानतो.

हे कविता संग्रह लिहिण्यासाठी मला प्रोत्साहित करूण वेळ प्रसंगी मदत करणारे माझे मित्र प्रा. डॉ. वैजनाथ अनुमुलवाड सर, प्रा. डॉ. सुनिल जाधव सर, डॉ. सुखदेव पाटील आणि श्री. अमृत आके सर यांच्या बद्‌दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

तसेच माझ्या कविता संग्रहास प्रत्यक्ष अप्रत्यक्षरित्या ज्यांनी–ज्यांनी सहकार्य केले त्यांच्या बद्‌दल मी सर्वांचे ऋण व्यक्त करतो.

**धन्यवाद......**

**कवी.– आनंद हिरालाल जाधव**

# दोन शब्द (मनोगत)

मराठी साहित्य क्षेत्रातले माझे प्रथम कविता संग्रह 'साहित्य साधना' वाचकांच्या हाती देताना मला अत्याधिक आनंद होत आहे. साहित्य साधना या कविता संग्रहाच्या द्वारे मी माझे मराठी भाषेवरील प्रेम व्यक्त करण्याचा प्रयत्न केला आहे. या काव्यकृतीत माझ्या एकुण 55 कविता असुन त्याद्वारे मानवी जीवणाच्या विविध पैलुना स्पर्श करण्याचा प्रयत्न मी केला आहे.

ही काव्यकृती तयार करण्यासाठी मला 02 वर्षांचा कालावधी लागला. त्यामध्ये मी मराठी भाषेचा गोडवा तिची थोरवी आणि साधना करण्याचा अल्पसा प्रयत्न केला. मला यामध्ये काही अंशी यशप्राप्ती ही झाली. त्याचीच फलश्रृती म्हणजे हा कविता संग्रह होय.

या कविता संग्रहामध्ये मी अनेक विषयांना स्पर्श करण्याचा प्रामानिक प्रयत्न केलेला आहे. शिक्षण, विद्यार्थी, शालेय जीवन, देव–धर्म, मानवीयता, जातीयता, विभुतीगौरव, शेती आणि शेतकरी यासारख्या विविधांगी विषयाला घेवन मी मुक्त छंदाच्या कविता रचल्या आहेत. माझ्या द्वारे रचलेल्या कविता आज पुस्तक रूपात प्रकाशित होत आहे. त्याचा मला मनस्वी आनंद होत आहे.

माझ्या द्वारा लिहिलेल्या कवितांना वाचकांचा चांगला प्रतिसाद मिळेल. या भावनेने प्रेरित होऊन माझी 'साहित्य साधना' ही काव्यकृती आज जाहिर रित्या समाजाप्रती अर्पण करित आहे. माझ्याद्वारे रचलेल्या कविता तुमच्या पसंतीस पडेल. तुमचे प्रेम, सहकार्य आणि आर्शीवाद माझ्यासोबत सदैव राहिल आणि मला पुढील साहित्यकृती निर्माण करण्याची प्रेरणा मिळेल. अशी अपेक्षा ठेवत मी माझी 'साहित्य साधना' आपल्या हाती सोपवित आहे.

धन्यवाद...........

**कवी.– आनंद हिरालाल जाधव**

# प्रास्ताविक

हैद्राबाद–कर्नाटकाचं वैशिष्ट्य सांगणारी कविता गेली दोन वर्ष झाली कोरोनाचा प्रचंड विळखा सबंध जगाला बसला आहे. लाखो माणसं यात बळी गेली. होत्याचं नव्हतं झालं. जग स्वाभाविकच श्री आनंद जाधव या कवी मनाला याची दखल घ्यावीशी वाटली. कोरोनाच्या परिणामाबदल ते लिहितात. लाखो लोक मारली गेली. कित्येक वर्ष वाया गेली. शाळा नीट चालेनात. शाळेवाचून मुलं वाया गेली. लॉकडाऊनने सर्वांची कंबर मोडल्यासारखं झालंय. लहान मुलांच्या हाती मोबाईल आले आहे. कोरोनाने जगण्याची रीतच बदलली असून सर्वत्र भीतीचे वातावरण पसरले आहे. विद्यार्थी परीक्षेविनाच पास होतात. शिक्षणाचा बट्याबोळ वाजला आहे. सर्वांना देव आठवले आहे. माणूस हतबल झाला की देवाकडे जातो. यथे कवीही देवाकडेच निघाला आहे. वाटेत त्याला शाळा भेटते. कोरोनाने सर्वत्र उदासीनता आलेली आहे. कवी म्हणतो,

'कोरा पडला फळा

शाळेची गेली कळा'

अशी अवस्था आहे. तरी परंतु तो आशावादी आहे. त्याला वाटते हेही दिवस जातील. चांगले दिवस येतील. शाळा पुन्हा भरेल. सर्वत्र आनंदी आनंद होईल. शाळेला जाता येईल. ज्ञान ज्योत पेटवता येईल. गुरू सानिध्य होईल. गुरू सांनिध्यात पुस्तके वाचता येतील. संस्कार चांगले होतील. पुस्तकाच्या सहवासात सरस्वती बसते अशी कवीची आशा आहे. अशा कवीला बळीराजाची आठवण येते. निसर्गाचा प्रकोप होतो. अति वृष्टीने शेतकऱ्याचं नुकसान होत. जगाचा पोशिंदा कर्जबाजारी होतो व उपाशी राहाण्याची त्याच्यावर पाळी येते. शेतकऱ्याच्या भीषण आवस्थेचं त्यांनी विदारक वर्णन केलं आहे. अस्मानी–सुलतानी मुळे ते जर्जर झाला आहे. अशी त्याची अवस्था झाली आहे. निसर्गाच्या प्रकोपामुळे बळीराजा कसा हतबल झाला आहे याचं वर्णन कवी इथे करताना दिसतो. कवी खेड्यातला

असुन शेती जीवनाशी निगडीत आहे. त्यामुळे ते जीवन कवितेत येणं स्वाभाविक आहे. शेती जीवनाचं वास्तव चित्रण श्री जाधव करताना दिसतात. शेतकऱ्याच्या वास्तव जीवनाचं चित्रण इथे पहावयास मिळते. कोरोनाच्या विषाणुने माणुस विषारी बनला असुन काट्याने काटा काढावा तसा हा माणूस बनला आहे. सुखी संसाराची फक्त स्वप्नेच राहिली. कवी म्हणतो,

''दुखावला हा माणूस
दुखावली सर्व नाती
आता आहे फक्त
कोरोनाची भिती''

असे असले तरी

''जीवनाला देऊनी आकार
स्वप्न करीन मी साकार
संकटात जरी मी सापडलो
तरी घेणार नाही मी माघार''

अनेक अडथळे आले तरी मी त्याच्यावर मात करीन, मी ध्येय साध्य करीन, मी खचून जाणार नाही, हिमतीच्या जोरावर मी गगनावर घाव घेईन, मोहनतीच्या जोरावर मी आयुष्य नंदवन बनवीन, त्यासाठी तन–मन झिजवीन,

''भविष्य मी या देशाचे
देश माझा अन् मी देशाचा
राखुनी या मायभूमीचा मान
करितो भारत मातेला प्रणाम''

अशी नवी स्वप्ने, नवे रंग तो उराशी बाळगून आहे. कोरोना रूपी काळाच्या दडपणाखाली ही दुनिया असून, हे जग गहिवरून गेले आहे. हे संकट केव्हा जाईल असे कवीला वाटते. त्यासाठी तो परमेश्वराचे स्मरण करतो. 'जगी ज्यास

कोणी नाही त्यास देव आहे.' या विचाराने तो ईश्वराकडे प्रार्थना करतो अशा वेळी देवा बरोबर आई वडिलांचीही त्याला आठवन येते व तो म्हणतो,

''आई माझी जीवनाचा आधार

बबांनी दिला जीवनाला आकार''

ईश्वराच्या जोडीला आई वडिलाच्या आर्शीवादाने हे जीवन नंदवन बनले आहे असे कवीला वाटते. म्हणून तो म्हणतो देवाच्या आधी मी आई–बाबापुढे होतो नतमस्तक आई वडिल, ईश्वर यांच्या प्रतीची भक्ती इथे दिसुन येते. तसेच संत तुकाराम यांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास 'बालपण देगा देवा मुंगी साखरेचा रवा' तसेच कवीला अशा वेळी संतांची आठवण येते. तो म्हणतो, 'प्रभू नामाचा लावुनिया लळा फलवितो भक्तीचाच मळा' अशी सकारात्मक भूमिका व्यक्त करतो. आयुष्यात नकारात्मक भूमिका असु नये असे त्याला वाटते. सज्जनतेचे बीज पेरीत, सत्संगाच्या माध्यमातुन तो प्रभूचे दर्शन घडवितो. तात्पर्य संत, आई वडिल, ईश्वर यांच्या बदलची श्रध्देची भावना कवितेतुन व्यक्त होते यांच्या जोडीला शाहु महाराज येतात, कवी म्हणतो,

''रयतेचा कैवारी राजा

छत्रपती शाहु महाराजा

दीन दलितांचे पुसुनी आश्रु

उभा केले जनतेचे साम्राज्य

समतेच्या तत्वावर

जनमानसावर केले राज''

महाराष्ट्रातल्या जनतेला शाहू छत्रपतीच्या कार्याचे मोठेपण कळने स्वाभाविक आहे परंतु इथे कर्नाटकातील कवीला सुध्दा त्याचं महत्व पटते व ते त्यांचे गुनगान गातो. या सगळ्यांच्या जोडीला धरती मातेचे महत्वही तो सांगतो. या ठिकानी पुन्हा कोरोनाच्या संदर्भातली माहीती येते व आईचे महत्वही पुन्हा येते. या गोष्टींची पुनरावृत्ती झालेली आहे. आईच्या जोडीला पंढरपुरचा विट्ठलही पुन्हा येतो. त्याच्यातून कवीची भक्तीची भावना दिसून येते. ही पुनरावृत्ती टाळता आली

असती तरी परंतु विठू, नाम, चंद्रभागा नदी, दिंडी, चंदनाचा टिळा विठू नामाचा फुलवुनी मळा वारकरी भरवितो आपुली शाळा हे ही नसे थोडके! विठ्ठलाच्या भक्ती बरोबर पाश्चात्य संस्कृतीने देशाचं वाटोळ केल असं कवीला वाटतं. आपल्या संस्कृतीचा अभिमान तो जागोजाग व्यक्त करतो. कविला निसर्गाचे आकर्षन आहे. धरती, मेघराजा इत्यादी बद्दल तो लिहितो,

''इंदिरा संतों साररखे

चरूदत्त हा कोन कोठूनी

अंगावरती फेकीन शेला

वसंत सेना वसुंधरे ने

झेलुनी तो हृदयाशी छदिला''

या उंचीवरचे हे नसेल पण निसर्गाबदल आदर पदोपदी व्यक्त होतो आहे. तो म्हणतो,

''वाट पाहुनी तुझी

पाणावले रे डोळे

कोरड्या पडल्या विहिरी

सुकले रे मळे''

पाऊस नसल्यामुळे विहिरी कोरड्या पडलेल्या असून मळे सुकले आहेत. पावसा अभावी होत असलेली शेतकऱ्याची दैना कवीने अनेक कवितांतून मांडलेली आहे. ना.धों. महानोरासारखं नांगरून पडलेली जमीन सर्वत्र असून सगळीकडे कोरडा दुष्काळ पडलेला आहे. त्याचे वर्णन तो अनेक कवितांतुन करतो आहे. शाळा, पुस्तके, गुरूजन याबदलच्या कविताही वेळोवेळी येतात. या बद्दलची पुनरावृत्ती टाळता आली असती. स्त्रियांबद्दलची आदराची भावनाही काही कवितांतून व्यक्त होते आहे. मराठी मध्ये स्त्रीला दासी समजले गेले परंतु कर्नाटकात महात्मा बसवेश्वरांना तिला देवी समजले. तीच भावना कवी जाधव काही कवितांतून व्यक्त करतात. बसवेश्वरांच्या अगोदर देव दासित्वाच्यांनी स्त्री पुरूष समानतेबदल लिहिले आहे. ते म्हणतात, ''दाढी आणि मिशा आहेत म्हणुन त्याला पुरूष

म्हणायच व स्तन व केस आहेत म्हणून तिला स्त्री म्हणायचं'' परंतु त्या दोन्हीं मधील आत्मा जो आहे तो एकच आहे असा विचार त्यांनी मांडला तोच विचार श्री जाधव आपल्या कवितातून मांडताना दिसतात. याच भावनेने ते ज्ञानज्योत घेऊन निघालेले आहेत. काही कवितांतून ते वेळेचे महत्व सांगताना दिसतात.

नव वर्षाच्या पूर्वसंध्येला 'नव वर्षाची नवी पहाट बघत आहे सर्वांची वाट' असं कवी म्हणतो, या वर्षी गान कोकिळा लता मंगेशकर यांचे निधन झालं. त्याबद्दलच्या भावना कवी व्यक्त करतो. आम्ही कर्नाटकात राहातो. मराठी भाषा, साहित्य व संस्कृती यांच्या संवर्धन / संरक्षण आहोरात्र झटतो. तीच भावना कवीने मायबोली, मराठी या कवितांतून व्यक्त केली आहे. ना. गो. नांदापूरकरांच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास,

''तोडा, चिरा दुग्ध धाराच येती
न वाहे रक्त हे शरीरातुनी
माझी मराठी मराठाच मीही
असे शब्द येतील हो त्यातुनी''

''मराठीने घडविले अनेकांना
जग नमन करितो त्यांना
संतांनी केला हिचा प्रचार
म्हणुन झाला मराठीचा प्रसार''

'आई' बद्दलची भावना पुनःपुन्हा आलेली आहे. ती टाळता आली असती 'चिमणी' वरची कविता मन भाऊन टाकते. तसेच कविते बद्दलही कवी लिहितो, तो म्हणतो,

''भावनांचा सागर कविता
विचारांचा जागर कविता
कवीची साधना कविता
कवीची कल्पना कविता''

कवीच्या भावना इथे व्यक्त होतात. तसेच जीवन, गुढीपाडवा या कविता ही मन वेचून घेतातत्र कर्नाटकात राहून ही मराठी भावना कवी जपतो याचा अभिमान वाटतो. दूर, लांब, कर्नाटकात रहून ही भावना जपणं अत्यंत अवघड असतं. कवी जाधव ते करतात. मराठीचा झेंडा फडकवतात.

"विद्येविना मती गेली

मतीविना नीती गेली

नीती विना गती गेली

गती विना वित गेले

इतके अनर्थ एका अविद्येने केले"

असं म्हणून ज्योतिबांनी बहुजनांचा विद्यादानाचा मार्ग प्रशस्त केला तसेच सावित्रीबाई फुले यांनी सुध्दा 'विद्याहीनता हे पशुत्वाचे लक्षण आहे.' असं म्हणून विद्येचं महत्व सांगितलं. जोतिबांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. सत्यशोधक समाज, आर्य समाज, प्रार्थना समाज, ब्राहमो समाज यांना चालना दिली. पूर्वी ज्ञानाची कवाड फक्त अभिजन वर्गापर्यंतच सीमित होती ती त्यांनी बहुजनांना खुली केली. ज्योतिबा फुल्यांच्या या ऐतिहासिक कामगिरीचा आढावा श्री जाधवांनी घेतलेला दिसतो. जयभीम म्हणून त्यांनी समतेचा मंत्र दिलेला आहे. आई–वडिलांचा मोठेपणा पुनःपुन्हा आला आहे. तो टाळता आला असता. श्री गणेशाचा महिमासुध्दा दिसुन येते. शेतकरी या विषयावरही कविता पुनःपुन्हा येताना दिसते. हैद्राबाद–कर्नाटकाचा हा भाग पूर्वी निजाम राजवटीत होता. त्यावेळी आपल्यावर उर्दूचा प्रभाव होता तर आता कन्नडचा प्रभाव अशा अनेक जाचातून आम्हाला जावे लागते. आमची कुचंबना होते त्यालाही कवीने मुखर करण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. अशा कचाट्यात आम्ही अडकलो आहोत तशात माय मराठी, मराठी साहित्य व संस्कृतीची जोपासना करावयाची!

**भालचंद्र शिंदे**

**अध्यक्ष**

कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद, गुलबर्गा–3'

अर्पण

''ज्यांच्या आशिर्वादाने मी जीवणाच्या प्रगती

पथावर मार्गग्रमण करीत आहे. ते

माझे आई–बाबा आणि गुरूंच्या चरणी माझी ही

'साहित्य साधना' अर्पण करीत आहे.''

# अनुक्रमणिका

# 1.श्रीगणेश

गणेशाची आठ रूप
त्यांना आवडतात मोदक खुप.

सुपाएवढं आहे त्यांचा कान
जगात पहिला त्यांचाच मान.

बुध्दिची ती आहे देवता
त्यांच्याच नावाने खुलतो खाता.

चतुर्थीला होते त्यांचे आगमन
त्यांना करूया आपण नमन

मोदकाचा चढतो त्यांना प्रसाद
भक्तांना देतात ते आशिर्वाद

अकरा दिवस होतात ते स्थानापन्न
नाम स्मरणानेच होतात ते प्रसन्न

## 2.विठ्ठलाची वारी

विठू माऊलीची निघालिया वारी
आषाढी एकादशीला पंढरपुरी ।।ध्रु।।

विठ्ठल नामाचा करत गजर
दिंडी चालली भरा–भर।।1।।

गावो–गावी जोडित माणसे
तहान–भुख त्यांशी नसे.
विठू नामांच्या रंगात–रंगुन
घालिती गोल–गोल रिंगन।।2।।

विठू दर्शनाची त्यांस आस
धरती त्यापायी आज उपवास.
चंद्रभागेमध्ये करूनीया स्नान
पवित्र करिती आपुले तन–मन।।3।।

लाविती चंदनाचा माथी टिळा
घालिती तुळशीमाळा आपुल्या गळा.
विठू नामाचा फुलवुनी मळा
वारकरी भरवितो आपुली शाळा.।।4।।

घेवूनी दर्शन धन्य तो होतो
प्रसाद घेवुनी गावी तो जातो
प्रपंच करूनी आपुला नेटका
नामस्मरणाने करितो सुटका।।5।।

## 3.साहित्य साधना

साधनेने व्यक्त झाले
मनातील अव्यक्त भावना
कागदावर अलगत उमटल्या
अंतःकरणातील वेदना||1||
काहीतरी सांगत होता
आलेला प्रत्येक दिवस
लेखनातून तू व्यक्त हो
क्षितिज गाठशील एकदिवस||2||
पर्वा करू नको जगाची
एकनिष्ठ हो लेखनिशी
खळखळणाऱ्या प्रवाहा सम
साहित्य क्षेत्रात तू रम||3||
साधनेने साध्य होते
अमूर्त ते मुर्त होते
मनातील भावनेला
अलगत पंख येते||4||
ओळख तू निर्माण कर
जीवनात तू रंग भर
साहित्य साधना तू कर
होशील तू रे अजरामर||5||
दिले तुला देवाने
कलेचं रे वरदान
जगामध्ये भरपूर आहेत
कलेचे रे कदरदान||6||

## 4.मराठी

पाडव्याला नववर्ष होत सुरू
चला मराठीच गुण गान करू
शब्द–अर्थाने समृध्द ही भाषा
पुर्ण करते साऱ्यांची आशा।।1।।

मराठीत ग्रंथसंपदा आहे विपुल
म्हणुनच हिच पुढे पडत पाऊल
बोलावयास मधुर ही भाषा
देवनागरी लिपीत आहे शिरोरेषा।।2।।

देश–विदेशात ही बोलली जाते
लता मंगेशकर मराठीत पण गाते
पाकृत पासुन झाला हिचा उगम
गीत गाण्यास आहे ही सुगम।।3।।

मराठीने घडविले अनेकांना
जग नमन करतो त्यांना
संतानी केला हिचा प्रचार
म्हणुन झाला मराठीचा प्रसार।।4।।

अभंग, ओवी, पोवाडे शोभतात हिच्यात
जिवणाला देतात ते आकार
मराठी भाषा दिनाच्या मुहुर्तावर
सारे करू मराठीचा पुरस्कार।।5।।

## 5.कोरोनाचे शिक्षण

कोरोनाने तर कमालच केली
परिक्षेविनाच पोर पास झाली।।ध्रु।।

शाळेला लागले कुलुप
ऑनलाईनची आली नवी झुळूक।।1।।

क्लासच्या निमीत्याने, मोबाईल हातात आले
पोरग अभ्यास करतय म्हणुन, मायबाप खुष झाले.
विना शाळेत जाता पोर शिकाया लागली
मोबाईल हातात घेवुन मोबाईलचीच भाषा बोलायला लागली।।2।।

कस होनार पोराच कांही समजना
घरी बसुन शिक्षण हे कोड कांही उमजना
कोरोनाच्या तिसऱ्या लहरीचे बळी कोण? ठरणार
शाळेत जाण्यापेक्षा पोरं घरी बसुन शिकणार।।3।।

मरण्यापेक्षा घरी बसुन शिक्षण बर
सरकार म्हणतय तेच आहे खरं
घरी बसा, सुरक्षित रहा, सरकारने दिला नारा
घरी बसुन अभ्यास करेल तोच विद्यार्थी खरा।।4।।

शाळेत जाण्याची आता करू नका घाई
कोरोनाची तिसरी लहर पण जाईल
स्वस्थ रहा, निरोगी रहा, मजेत जगा
कोरोना आणखी काय? काय? करतो ते गुपचुप बघा।।5।।

## 6.माझी शाळा

अधीर झाले मन
माझी शाळा पाहुन।।ध्रु।।

कोरोनाच्या धास्तीने
विद्यार्थ्यांच्या अनुपस्थितीने।।1।।

वर्षा मागुन वर्ष गेला
शाळेमधला हर्ष गेला
विना विद्यार्थ्यांच्या शाळेतला
सारा उत्कर्ष गेला।।2।।

कोरा पडला फळा
शाळेची गेली कळा
नाही राहिला लळा
अभ्यास झाला वाटोळा।।3।।

नाही कसली परिक्षा
नाही कसली शिक्षा
नाही शाळेचा भात
नाही मित्राची खबरबात।।4।।

ऑनलाईनने जीवनदान दिले
तरी शाळेचे भान गेले
प्रार्थनेतील राष्ट्रगीत गेले
जीवनातील संगीत गेले।।5।।

केंव्हा बहरणार शाळा

दिवसामागुन दिवस गेले
देवासमोर नवस केले
तरी आदेश नाही आले.||6||

मी आशेवरती कायम आहे
कोरोनाचा कहर कमी होणार
माझी शाळा पुन्हा भरणार
सर्व कांही पूर्ववत होणार||7||

## 7.चला जाऊया शाळेला

चला जाऊया शाळेला
उभ आयुष्य घडवायला।।ध्रु।।

ज्ञान ज्योती पेटवायला
संस्काराचे मोती वेचायला।।1।।

गुरू सानिध्य मिळवायला
सवंगड्या संग खेळायला
शिकु लिहायला वाचायला
जीवनाचा आनंद लुटायला।।2।।

गमती जमती करायला
पाटी–पुस्तक धरायला
पोषण आहार खायला
गरम दुध प्यायला।।3।।
जीवनाचे धडे गिरवायला
संगीतातला सुर ऐकायला
एकाग्र चित्त व्हायला
मनातील भाव व्यक्त करायला।।4।।

जीवन सार्थक करायला
आयुष्यात मोठ बनायला
आई–वडीलांचे ऋण फेडायला
देशाच नाव कमवायला।।5।।

## 8.पूस्तके

संगतीत पुस्तकांच्या
घडतात मस्तके
सहवासत त्याच्या
सरस्वती वसे||1||
ज्ञानाच्या जोरावर्ती
अज्ञान तो क्षमवितो
विद्याबुध्दी देऊनी
ज्ञानी तो बनवितो||2||
विवेकाला जागउन
क्रांती तो घडवितो
शुन्यातुन विश्व
तो निर्माण करवितो||3||
सुख–दुःखामध्ये
साथ तो देतो
संकटामध्ये तो
उपदेशही देतो||4||
वैचारिक दृष्टीने
परिपक्व बनवुन क्रांती तो
घडवून आनितो||5||
धन–दौलती बरोबर
सन्मान तो देतो
जीवनाला एक
नवी दिशा तो देतो||6||
म्हणुनच तो सर्वांना
हवा–हवा सा वाटतो
निस्वार्थ भावनेने
जीवन घडवितो||7||

## कोरोना इफेक्ट

पाटी पुस्तकावर बेतला कोरोना
लाखोलोक मारून याच मन भरेना
वर्षा मागुन वर्ष गेली वाया
तरी आमची शाळा नीट भरेना।।1।।
शाळेवाचुन पोर गेली वाया
गोर–गरिबांना अन्न नाही खाया
लॉकडाऊनने मोडली सर्वांची कंबर
टेंशन घेवुन वाढला चष्म्याचा नंबर।।2।।
भितीने याच्या जगणं झाल कठिण
ऑनलाईन वरच घेतली जाते मिटिंग
क्लाससाठी पोराच्या हातात मोबाईल आल
अन पोरग भलतीकडेच गेल।।3।।
कोरोनाने बदलली जगण्याची रीत
पोर शाळेत येतात भीत–भीत
भाषा असो वा शास्त्राचा क्लास
पुढच पाठ अन मागच सपाट।।4।।
लावावा लागतो साऱ्यांनाच मास्क
परिक्षेविनाच पोर होतात पास
शिक्षणाचा झाला खेळ–खंडोबा
आठवतोय सर्वांना पंढरीचा विठोबा।।5।।

# 9.पुस्तक

पुस्तकाने घडतात मस्तक
व्हावे त्याच्या पुढे नतमस्तक
असते त्यात अनुभवाची शिदोरी
करत नाही कुणाशी गद्दारी||1||
संगतीने ह्याच्या माणसं घडतात
सर्वात संस्कारांचे दर्शन जडतात
जो करतो नियमित ग्रंथ पुजा
त्याच्या मजबुत होतात भुजा||2||
समाजाला हा देतो निश्चित दिशा
जागृत करतो त्यांच्यात सुप्त आशा
जीवन जगण्याची कला शिकवतो
शुन्यातुन विश्व पण निर्मितो||3||
हा आहे सखा जिवाभावाचा
कधीही करित नाही निराश
प्रसंगी निभावतो भिन्न भूमिका
जीवनात आणतो नवीन प्रकाश||4||
पुस्तकावाचुन निरर्थक हे जीवन
ह्याच्या संगतीने होऊ सारे पावन
मिळेल जीवनाला निश्चित दिशा
पुर्ण करू इच्छा आणि आकांक्षा||5||

## 10.शिक्षण

पाटी–पुस्तकाची साथ, करते रे विकास।
तू घे रे आता, शिक्षणाचा ध्यास।।धृ।।

धरल्याने शिक्षणाची कास, जीवन होते खास।
याने मिळतो सन्मान, जागृत होतो स्वाभिमान।।1।।

सोडू नको तू रे, शिक्षणाची साथ।
नाहीतर होईल तुझा, पावलो–पावली घात।।3।।

गेल्याने शाळेत, मिळतो ज्ञानाचा प्रसाद।
दूर होतो अज्ञानाचा, काळोखा अवसाद।।4।।

शिक्षणाने घडतो माणूस, होतो रे सुजाण।
नाही राहत त्याच्यासाठी, काहीही अजाण।।5।।

शिक्षणाने माणूस, गुर–गुर करतो।
कोणत्याही संकटातून तो, अलगत तरतो।।6।।

चला दिप लावू आता, शिक्षणाचा घरोघरी।
त्याने मिळेल सन्मान आपल्याला, जगाच्या पाठीवरी।।7।।

## 11.व्यथा माणसाची

माणसाने माणसाशी
राहावे जपुनी.
कोरोनाच्या विषाणुने
माणुस बनला विषारी. ||1||

काट्याने काटा काढावा
तसा बनला हा माणुस
संक्रमणाच्या धास्तीने
दुरावला हा माणुस.||2||

व्यथा माणसाची
कथा बनुनी राहिली
सुखी संसाराची स्वप्न
फक्त स्वप्नच राहिली.||3||

दुरावला हा माणुस
दुरावली सर्व नाती.
आता आहे फक्त
कोरोनाची भिती.||4||

केंव्हा होईल माणुस
या संकटातून मुक्त.
त्यासाठी सर्वांनी करावे
नियमांचे पालन सक्त.||5||

## 12.माझे ध्येय

जीवनाला देऊनी आकार
स्वप्न करीन मी साकार
संकटात जरी अडकलो.
तरी घोणार नाही मी माघार।।1।।

आयुष्याच्या वळणावरती
जरी अडथळे आले हजार.
त्याने मी होनार नाही बेजार
माझी ध्येय करीन मी साकार।।2।।

नाही बसणार खचून
चिंतेचे मनोरे रचून
आपल्या हिमतीच्या जोरावर
धाव घेईन गगनावर।।3।।

आयुष्याला मेहनतीच्या जोरावर
बनवीन मी नंदनवन
त्यासाठी झिझवीन तन–मन
अन सुंदर बनवीन जीवन।।4।।

भविष्य मी या देशाचा
द्वेश माझा अन मी देशाचा
राखुनी या मायभूमीचा मान
करितो भारत मातेला प्रणाम।।5।।

## 13.नवी पहाट

स्वप्न नवे, रंग नवे
सावरूनी बसली ही दुनिया.
लॉकडाऊनच्या तडाख्याने
रूसुनी बसली ही दुनिया.||1||

कोरोनारूपी काळाच्या दडपणाखाली
भयभीत झाली ही दुनिया.
नाती–गोती दुरावुनीया
एकटी पडली ही दुनिया.||2||

काळाच्या पडद्याआड गेली
जवळची आपली माणसे
आठवणीत रमुनी त्यांच्या
गहीवरुण गेली ही दुनिया.||3||

केंव्हा क्षमेल हे संकट
पाणावुन गेले नयन
परमेश्वराचे स्मरण करूण
रमवीते ही दुनिया आपुले मन.||4||

ओसरेल हे संकट
या आशेवरी ही दुनिया.
चला आपण सर्वजन
नव्या पहाटेची प्रार्थना करूया.||5||

## 14.बालपण

बालपण दे गा देवा मजला
प्रार्थना करितो मी तुजला।।ध्रु।।
आठवणीने गहिवरते मन,
म्हणूनच पाहिजे मला बालपण।।1।।

काय ते दिवस, काय त्या आठवणी
आजतागायत बसल्या त्या ध्यानीमनी.
पक्षासंग मुक्त संचार
नाही कशाचाच विचार।।2।।

आयुष्याच्या वळणावरती
असंख्य आहेत अडचणी
त्यांना पाहुण वाटते
पुन्हा जावे बालपणी।।3।।

सख्या–सवंगड्यासंगे
घालविले मी बालपण.
म्हणूनच आवडते मला
माझे हे बालपण.।।4।।

नाही कसले संकट
नाही कसला विचार
म्हणूनच करतो मी
माझ्या बालपणीचा प्रचार।।5।।

## 15.ज्ञान ज्योत

चला पेटवु ज्ञान ज्योत
विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या युगात
येईल आनंदाची भरती
आधुनिक शिक्षणाच्या वाटेवरती||1||

टिकवुन आपली संस्कृती
मिटवु समाजातील विकृती
ज्ञानाच्या जोरावर्ती
फुलवुयात नवी प्रकृती||2||

मलिन असंस्कृत वाटा
पुसुनी टाकुया आता
सुसंस्कृत समाजामध्ये
निर्माण करू नवीन नाता||3||

मिटवुयात सारे भेद
जागेल नवी उमेद
ज्ञानाचे पंख लावुनी
घेवुयात उंच झेप||4||

या देशातील प्रत्येकात
जागवुनी देशाभिमान
मानवतेचा दिपस्तंभ
प्रकाशमान करूयात ||5||

## 16.वेळ

वेळ आहे अनमोल माणसा
वेळेला तु जाण माणसा ।।ध्रु।।
नियतिचा हा खेळ माणसा
ओळखुन तु चाल माणसा।।1।।

वेळेवर जो करतो कर्म
त्याचे जीवन होते पावन
वेळे पेक्षा जगती कोणी
नाही आहे रे बलवान।।2।।

भुत भविष्यात रंगुनी
मोहजालात अडकुनी
वर्तमान तु गमवु नको
वेळेला तु दवडू नको।।3।।

लहाणपण खेळण्यात
तारूण्य झोपण्यात
म्हातारपण रडण्यात
व्यर्थ तु घालवु नको ।।4।।

वेळ आणि कर्माची
सांगड घालुनी तू
यशाची तु कास धर
सुख भोगशील जीवनभर।।5।।

दिवास्वप्न रंगवुनी
वेळ घालवु नको

स्वतः बरोर तू
जगताचा उध्दार कर||6||

वेळ नाहीरे कोनाची
जो तिच्याबरोबर चालेल
वेळेवर जो जागेल
वेळ होणार रे त्याची||7||

## 17.मोबाईल फोन

तंत्रज्ञानाच पसरल लोन
वाजु लागल मोबाईल फोन
आता मित्र, नातेवाईक सुध्दा
पाळत नाहीत मौन।।1।।
उचलल फोन लावल कानाला
बोलुन शांती मिळेना मनाला
याच बील येत क्षणाला
तरी चैन पडेना मनाला।।2।।
मोबाईल बनलाय आता
जीवा—भावाचा मित्र
त्यावर दिसत आजकाल
व्हीडीओ कॉल वर चित्र।।3।।
कॉन्फरन्सींग मध्ये जोडून माणसे
रंगवितो मित्राची मैफल
ॲपच्या द्वारे ट्रेनिंग देऊन
चालवितो प्रशिक्षणाची सायकल।।4।।
आजकाल अबाल वृध्द
सरास करतात याचा वापर
नेटवर्क गेल्यावरच बंद करतात
मोबाईल फोनचा खापर।।5।।
चित्र—विचित्र आकारात
मिळतो आजकाल मोबाईल
सोशल मिडियावर पोस्ट टाकुन
देतात सर्वजन स्माईल।।6।।
केल्याने मर्यादीत वापर
जीवन बनवितो हा सुखकर
अती हव्यासापायी याच्या
आयुष्य बनेल दुखकर।।7।।

## 18.मोबाईल

प्रसन्न झाला मोबाईल मानवा
म्हणे माग तुझ काय हवे ते
माणुस वधला 'नेट' हवे मज
साध्य सर्व ही एका नेट ने||1||

नेट मिळाले हो मानवा
घर बसल्या सर्व काम सारी
चॅटिंग–बॅटींग ची पारी
सर्व एका 'टच' वर करी||2||

नेट मिळाले, चॅट मिळाले
गप्पा परी मनातच राही
हतबल आणि हताश मानव
पून्हा उभा मोबाईलच्या दारी||3||

काय हवे तुझ? मोबाईल बावरला
मानव वदला 'ॲप्स' हवे मज
त्यांने जींकिन मी सारे जग
आणि भोगीन साऱ्या सुख–सोई||4||

ॲप्स मिळाले, शेअरइट मिळाले
सारे जीवन मोबाईलमय झाले.
त्याने मोबाईलमध्ये व्हायरस आले
आता मोबाईल बंद पडले||5||
मोबाईल मानवावर बावरला
म्हणे तुझी खैरच नाही.
तुला देतो मी आज शाप
टेंशन, ट्युमरची तुला येईल साथ.

## 19.फोन

पाहुण तुझ्या फोनची वाट
दाटून येते माझे मन.
फोनची रिंग वाजली की
तुझी आठवण येते चटकन.||1||

लॉकडाऊनने घातला सारा घोळ
आता जीवनात नाही कसला मेळ.
तुझ्या फोनची वाट बघण्या खेरीज
माझा जात नाही गं वेळ||2||

बाकी सारं काही मस्त आहे.
तू बोलत नाहिस म्हणून मी अस्वस्थ आहे.
तुला फोन लावल तर,
उत्तर मिळत तु व्यस्त आहेस||3||

आज पावसाला झाली सुरूवात
तुझ्या आठवणीने झालो मी चिंब
दुसऱ्याच्या फोनची रिंग ऐकुण
माझे स्वप्न होते गं भंग||4||

आता तू करू नको मला तंग
चर्चा करूया आपण फोन संग.
तुझ्याशी फोनवर चर्चा करून.
माझ्या जीवनात येईल नवी उमंग||5||

## 20.भात

माझ्या सरकारी शाळेचा भात
करतो आनंदाची बरसात.
मुलाचे पोषन करतो आरामात.
करतो खुप–खुप करामात.
माझ्या सरकारी शाळेचा भात।।1।।

यामुळे मुलांमध्ये येतो नवचैतन्य
मुलांचे मन होते प्रसन्न
शाळेत होते मुलांची गर्दी
त्यामुळे कमी होते विद्यार्थ्यांची गळती
माझ्या सरकारी शाळेचा भात।।2।।

सरकार करतो यासाठी खर्च
यावर होत आहे मोठा रिसर्च
मुलांना शाळेत टिकवण्यासाठी
होत आहे सारा खटा–टोप.
माझ्या सरकारी शाळेचा भात।।3।।

यामुळे शिक्षक अन् विद्यार्थ्यांना मिळते मेजबानी.
त्यांची नाती होतात ताजी–तवानी
सर्वांना लागते शाळेची ओढ
त्याचा शेवट होतो नेहमीच गोड.
माझ्या सरकारी शाळेचा भात।।4।।

## 21.माझी सरकारी नौकरी

देते हक्काची भाकरी.
होती ती माझ्या.
सदैव घ्यानी मनी.
माझी सरकारी नौकरी||1||

मिळाली ही खुप प्रयत्नाने
त्यासाठी करावी लागली साधना.
ईश्वरापाशी करतो मी आराधना
टिकावी ही खुप काळ हीच प्रार्थना.
माझी सरकारी नौकरी||2||

ज्या शाळेत मी गेलो
तेथे मी प्रसिध्द झालो.
येथे पण सर्वांना हवा–हवासा वाटेन
माझे काम सर्वांना पटेल.
माझी सरकारी नौकरी||3||

शाळेच्या विकासासाठी मी झटेन
विद्यार्थ्यांचा सर्वांगीन विकास मी करेन
शिक्षक धर्मांचा मान मी राखेन
देशाचा शिल्पकार मी बनेंन
माझी सरकारी नौकरी||4||

## 22.प्राण्याची शाळा

एके दिवशी जंगलामध्ये
भरली होती प्राण्याची शाळा
जमले होते सर्व प्राणी
घेऊनि पाटी आणि फळा||1||

कासव दादा आले हळूच
घाबरून बसले होते दूर
खारूताई पळत होत्या
झाडाभोवती तूर तुर||2||

वर्गामध्ये बसले प्राणी
घालून आपले आसन
सिंह गुरूजी धावून आले
गर्जून त्यांनी दिले भाषण||3||

वर्गामध्ये होती शांतता
कोणी काही बोलेना
सिंह गुरूजी समोर
कोणाचे काही चालेना||4||

माकड दादाला गंमत सुचली
त्यानी गाढव दादाची पाटी घेतली
झाडा वरती उंच ठेवली
वर्गामध्ये झाला गोंधळ||5||

सर्व प्राणी शोधू लागले
पाटी काही सापडेना
हत्ती दादाला माकडाची

गंमत काही अवडेंना||6||

इतक्यात सुटली शाळा
कोल्हे दादांनी माकडाला दिला शाळेतील फळा
गळा भेट घेऊनी प्राणी गेले
आप आपुल्या घरा||7||

## 23.पोषण आहार

पोषण आहार पुरवताना
एच.एम. च्या नाकी आले नऊ
केळं आणि अंडे खाऊन
विद्यर्थी लागले गाऊ।।1।।

शासनाची योजना आहे ही खास
विद्यार्थ्यांचे वाढू लागले मास
अंडे न खाणाऱ्यांना
त्याचे येऊ लागले वास।।2।।

या योजनेने विद्यार्थी संख्या
जोमांने आहे वाढत
गुणात्मक वाढीमध्ये सुध्दा
होत आहे बढत।।3।।

पोषण आहार खाऊन मुल झाली आनंदी
योजना बंद पडली तर
होतील त्यांची वांदी।।4।।

शाळेचे आकर्षण वाढविण्यास
कमालीची आहे ही योजना
शालेय वातावरणातच करतील
विद्यार्थी नित्य साधना।।5।।

## 24.मायबोली

अज्ञानीला ज्ञानी बनविते
मनुष्यावर संस्कार घडविते
शुन्यातुन विश्व निर्मिते
माझी माय बोली||1||

मायबोलीची महिमा न्यारी
विस्तरली ती दिशा चारी
वाटते ती सर्वांना प्यारी
कर्म करू तिच्याने सारी||2||

गावी हिची थोरवी
ऐकविते ही राग भैरवी
कर्ण मधुर हिची भाषा
जागृत करते सुप्त आशा||3||

सर्वांना एकजुट ठेवते
सुसंस्कारांने वाट दावते
मातेसम लळा लावते
देशाचे सम्मान वाढविते||4||

मायबोलीला टिकवुन ठेवु
करू सर्व भाषेचा आदर
तरच जगतामध्ये होईल
मायबोलीचा जागर||5||

## 25.नात

आयुष्याच्या वळणावरती
असेल नात्यांची साथ
तर जीवनात येईल
आनंदाची बरसात||1||

फुलातील मकरंद, वेचते जशी मधमाशी
जपावी तशी सर्वांनी
आप–आपली नाती||2||

विनावे जाळे नात्यांचे
त्यात गुंतुनी रहावे
सुख–दुखाच्या प्रवाहात
सतत वाहुनी जावे||3||

प्रत्येक नात्याचे महत्व
वेग–वेगळे असते
नात्याच्या दृष्टीमुळे
जग चांगले दिसते||4||

नात्यांना अगणित
असंख्य असतात नावे
नात टिकविण्यापायी
अग्नीदिव्यातुनही जावे||5||

गावी नात्यांची थोरवी
बहरेल घराची ओसरी
जोडल्याने नात्यांची माळ
सुंदर बनेल प्रत्येक सकाळ||6||

## 26.गुगल गुरूजी

गुगल गुरूजी, गुगल गुरूजी
यांची चालते इंटरनेटवर मर्जी
करतात हे साऱ्यानचे समाधान
जगात आहे यांना मोठा मान।।1।।

क्षणार्धात करतात समस्याचे निराकरण
भरूण येते प्रत्येकाचे अंतःकरण
रात्र–दिवस करतात हे काम
घेत नाहीत कुणाकडून ही दाम।।2।।

सर्वच क्षेत्रामध्ये करतात हे कमाल
अबाल–वृध्द यांच्या सोबत करतात धमाल
ज्ञानाचा खजिना यांच्याकडे मोठा
यांच्या अनुयायीना कशाच नाही तोटा।।3।।

आधुनिक युगात यांच मोठ वनज
यांच्या सहायाने ऐकता येत भजन
पाहिल्यानं याना प्रसन्न होत मन
केंव्हाही करतात हे सर्वाचं मनोरंजन।।4।।

इशाऱ्यावर यांच्या नाचत जग
नेटवर्क गेल्यावर स्वप्न होते भंग
सर्व्हिस ने आपल्या करतात दंग
यांच्यामुळे आहे जीवनात उमंग।।5।।

## 27.आई–बाबा

आई माझी जीवनाचा आधार
बाबानी दिला जीवनाला आकार.
दोघांच्या छत्र–छायेमध्ये
वाढला हा बाळ–गोपाळ||1||

नऊ महिने, नऊ दिवस
शोषिल्या आईने कळा.
लहानाचे मोठे करण्यासाठी
बाबाने शोषिल्या झळा.||2||

दोघांच्या ममतामयी कुशीत
घेतला मी स्वास.
त्यांच्या मार्गदर्शनानेच
जीवनात झालो मी पास.||3||

आशिर्वादाने त्यांच्या
जीवन बनले नंदनवन
म्हणुनच त्यांच्या चरणाशी
रमते माझे मन||4||

त्यांच्या पुण्याईच्या बळावर
मी संकटातुन होतो मुक्त.
म्हणुनच देवाच्या आधी मी
आई–बाबापुढे होतो नतमस्तक.||5||

## 28.आई

आई गाते अंगाई
लेकराले झोपविन्या पाई
काम करते रात–दिन
घराला घरपण आनण्यापाई।।1।।

सोसिते अनंत यातना
साऱ्यांना खुष ठेवण्यापाई
केलेल्या कामाच्या बदल्यात
एक छदामही घेत नाही।।2।।

उरल–सुरल खाऊन, भागविते आपली भुख
निमुटपणे सोसिते
सर्वांच्या वाटणीचे दुःख।।3।।

सण–वारामध्ये
करते गोड–धोड
आपल्या पोरास जपते
जसे हातावरले फोड।।4।।

तिच्या कामास नाही तोड
तिच्यामुळे जीवन होते गोड.
ती आहे धरणीवरच देव
जोडून हात तिच्यासमोर बसाव।।5।।

गावी तिच्या उपकाराची थोरवी
तीच आहे राग भैरवी
स्वर्ग आहे तिच्या चरणाशी
ठेवू नका तिला उपाशी।।6।।

## 29.बाबा

मला माझ्या पायावर, उभं केल तुम्ही।
मला हवं ते, वेळेवर पुरविलात तुम्ही।।1।।

तुम्हीच आहात माझे, आदर्श व्यक्ती।
तुमच्या बोलण्यानेच आली, माझ्यात शक्ती।।2।।

वेळ प्रसंगी मला, धीर दिला तुम्ही।
म्हणूनच मी तुम्हाला, देव मानतो ध्यानी मनी।।3।।

बाबा तुमच्या सुसंस्कारांनी, घडलो मी।
जीवनातील संकटाशी, धीराने लढलो मी।।4।।

तुम्हीच आहात माझे, खरे शिल्पकार।
तुमच्या त्यागाला करतो मी, रोज नमस्कार।।5।।

तुमचा आशीर्वाद असुदे, माझ्या सोबत।
माझ्या प्रगतीकडे, ही दुनिया राहील बघत।।6।।

## 30.आई

आई ग आई
गाते तु अंगाई
तुझ्या चरणामध्ये
रमतो ग साई||ध्रु||
रात–दिन एक
करते तु माझ्यापाई
हातभार लावते
पतिच्या संसारालाही||1||

दुखत जवा मला
त्रास तुला होतो
तुझ्या अंतकरणातुन
आश्रु श्रवतो||2||

वेळामध्ये वेळ
काढते तु माझापायी
मला मोठ करण्यामध्ये
वाटा तुझा ग आई||3||

तुझ्या उपकाराची
परतफेड होणार नाही
तुझ्या खुशालीची
प्रार्थना करतो मी आई||4||
तु रहा ग माझ्या
सदैव ध्यानी मनी
विनंती करतो तुला
भोळ्या भक्तावाणी||5||

## 31.आई–वडील

ाई–वडिलांच्या कष्टाला तोड नसते
त्यांनी दिलेली चटणी–भाकरही गोड असते.
आपल्या मुलांना देतात ते मायेची उब
ते आहेत पृथ्वीवरील परमात्याचे प्रतिरूप।।1।।

दर्शन घ्यावे त्यांचे भल्या पहाटे
दिसतील सर्वांना प्रगतिची वाटे
ते आहेत आपले पालणहार
आशिर्वादाने त्यांच्या खुलतात स्वर्ग द्वार।।2।।

करू नये त्यांच्या आशेची अवज्ञा
त्यांच्या खुशालीची करावी प्रार्थना
आपल्यासाठी ते रात्र दिवस झटतात
त्यांच्या मायेच्या कुशीतच आपले दिवस कटतात।।3।।

त्यांच्या छत्रछायेमध्येच आपण वाढतो
त्यांच्या मार आणि बोलण्यानेच घडतो
ते आहेत आपले प्रथम गुरू
त्यांच्या मार्गदर्शनानेच आपण तरू।।4।।

करावे त्यांची नित्य आराधना
पुर्ण होतील आपल्या मनोकामना
नित्य ठेवावी त्यांची आठवण
त्याने आर्शिर्वादाची होईल साठवण।।5।।

## 32.शाहु महाराज

रयतेचा कैवारी राजा
छत्रपती शाहु महाराजा ।।ध्र।।
दिन–दलितांचे पुसुनी आश्रु
उभा केला जनतेचा साम्राज्य
समतेच्या तत्वावर
जनमानसावर केला राज।।1।।

उभ्या करूनी शाळा
वाटिला ज्ञानाचा प्रसाद
शाने करूनी सोडीला
सकळ जन–समुदाय।।2।।

जाती–धर्माच्या जोखडातून
मुक्त केला समाज
त्यांच्या कृपेच्या जोरावर
रयतेने केला बुलंद आवाज।।3।।

शेतकऱ्यांच्या समस्या सोडवुन
घडवुन आणली त्यांनी क्रांती
बेरोजगारांना रोजगार देऊन
केली त्यांनी सर्वांची मनःशांती.।।4।।

न भुतो न भविष्यती
नाही होने ऐसा राजा.
सन्मानाचे जीवन दिले
त्यामुळे नमन करिती सारी प्रजा।।5।।

## 33.महात्मा फुले

स्त्री शिक्षणाचा घेऊनी ध्यास
समतेचा केला यांनी विकास
स्त्री शिक्षणापाई शोषिल्या यातना
चला सारे प्रणाम करूयात त्यांना||1||

सावित्रीबाईना सोबत घेवुन
शाळा उघडल्या गल्लो गल्ली
त्यांच्या या संघर्षमय जीवनाला
आज देखील प्रणाम करते दिल्ली||2||

शिक्षणाबरोबर समाज सुधारनेचा
उचलला होता यांनी विडा
समाजिक विषमतेचा यांनी
सोडविला बुध्दीमत्तेने तिढा||3||

सत्यशोधक समाजा द्वारे
घडविला त्यांनी नवीन समाज
त्यांच्या कार्याची पावती
पहावयास मिळते जनमानसात||4||

अस्पृश्यता निवारणासाठी त्यांनी
आपल्या घरापासुन केली सुरूवात
पाण्याचा हौद, सर्वासाठी खुल करून
जागा बनविली लोकांच्या मनात||5||

## 34.लता दीदी

पंचतत्वात विलीन झाली
भारताची गाण कोकीळा
निघुन जाण्याने त्यांच्या
सगळीकडे पसरली शोककळा||1||

मुग्ध होत होते रसिक
सप्तसुरांनी त्यांच्या
संगित क्षेत्र बनले पोरखे
सुरा विना लतादीदींच्या||2||

अर्पिला त्यांनी जीवन
संगिताच्या सप्तसुरावर
अनेक–दशके राज्य केली
जगभरातील जनमानसांवर||3||

त्यांच्या सारखा साधक
नाही होने आता
त्यांची गाणी गुणगुणतो
भारतीय येता–जाता||4||

चाहत्यांनी दिला निरोप
नयन अश्रुनी त्यांना
तुम्ही सदैव असाल आमुच्यात
गायिलेल्या गीतातुन तुमच्या||5||

## 34.जय भीम

भीमा तुने जागविले
स्वाभिमान आमुच्यात
समतेचे मंत्र दिले
भारतीय जनमानसात।।1।।

तुझ्या कष्टाची फळ
चाखतो आज आम्ही
मुक्या मानवाला दिली
तुने कायद्याची वाणी।।2।।

जाती–पातीची बंधने
तोडली रे तुने
एकतेचे सुत्र देऊन
जोडलीस सर्वांची मने।।3।।

गावी तुझी थोरवी
तेव्हढी आहे कमी
तुने दिली सर्वांना
प्रगतिची हमी।।4।।

तु आहेस शिल्पकार
भारतीय संविधानाचा
नमन करतो तुझ्या
एक–एक विधानाचा।।5।।
शोषुनी अनेक यातना
मोडला नाही तुझा कणा
तर चला मग एक दिलाने
सारे जय भीम म्हणा।।6।।

## 35.शिवराज्याभिषेक सोहळा

स्वराज्याचे स्वप्न पहाताना, तुमचे वय होते कोवळे।
रायगडावर साजरे करू, तुमचे राज्याभिषेक सोहळे।।धृ।।

स्वराज्याची स्थापना, केली हो तुम्ही,
नमन करतो तुम्हा, रात्रं–दिन आम्ही।।1।।

जन्म झाला तुमचा, शिवनेरी किल्यावर।
जिजाऊ ने सांभाळ केला, आपल्या जीवावर।।2।।

लहानपणीच पाहिले तुम्ही, स्वराज्याचे स्वप्न।
दिन–दलितांना सोबत घेऊन, पूर्ण केला यत्न।।3।।

तुम्ही जिंकली हो मने, गोर–गरिबांची।
तुमच्या राज्यात कारण नव्हती, हो दुःखाची।।4।।

अन्याया विरूध्द लढा देऊन, स्थापिले स्वराज्य।
त्यामुळेच तुम्ही आहात, आमच्या दिलात अविभाज्य।।5।।

आज आहे दिन, शिवराज्याभिषेकाचा।
दिवा पेटविला तुम्ही, रयतेत माणुसकीचा।।6।।

आई भवानीच्या कृपेने, तुम्ही उभा केला स्वराज्य।
तुमच्या राज्याभिषेक दिना दिनी, नमन करतो समाज।।7।।

## 36.संत

जीवनाला दिशा देतो संत
जसे सृष्टीला फुलवितो वसंत
किमया दोघांचीही निराळी
दुनिया प्रभुनामाची वाजवीते टाळी.||1||

दुर्गुनांचे करूनिया दमन
संत करितो निर्मळ मन.
प्रभू नामाचा लावुनिया लळा
फुलवितो भक्तीचाच मळा.||2||

माणसातला माणुस जागवुनिया
सज्जनतेचे बीज पेरितो.
सत्संगाच्या माध्यमातूनी
प्रभूचे दर्शन तो घडवितो.||3||

मोहमायेच्या जोखडातुन
मुक्त करितो नर देह.
देऊनीया निर्मल दृष्टी
करितो प्रेमाची वृष्टी.||4||

प्रभू दर्शनाचा ध्यास लावुनिया
सत्कर्म तो करिवतो.
सुखी जीवनाचे मर्म सांगुन
परमेश्वराचे दर्शन तो घडवितो.

## 37.पार्वतीनंदन

वंदन–वंदन पार्वतीनंदना
वक्रतुंड तू गजानना
करितो तुझी आराधना।।ध्रु।।

प्रथमेश तु, एकदंत तू
मयुरेश्वर तु मोरया.
भक्त अभा हो तुझ्या दारिभा।।1।।

बुध्दीचा तु आहेस देवता
रिध्दी–सिध्दीचा तू भर्ता
तुझ्या नावाने खुलतो खाता।।2।।

तुझ्या दारी येणारा भक्त
तुझ्या कृपेने होतो मस्त.
म्हणुनच तुला मिळाले तख्त।।3।।

तू आहेस प्रथम देवता
तूझ आहे सर्वप्रथम मान
तू आहेस सर्वांची शान।।4।।

## 38.देवा

देवा तुझ्या दारी, उभा हा भक्त
तुझ्याच दर्शनाची, आशा आहे फक्त.||1||

तू असता पाठिराखा, भिती नाही कसली
ही दुनिया आहे, दिखाण्याची नकली.||2||

तूझे रूपू पाहता, विसर पडतो जगाचा
पावन होतो आत्मा, अन् दुःखाचा होतो खात्मा||3||

मुक्तीसाठी भक्ती, रीत आहे जगाची
तुझ्या प्राप्तीसाठी, तयारी हवी मनाची||4||

वाईटाचा आहेस तू, कर्दन काळ
म्हणूनच असते सदा. तुझ्या गळ्यात माळ||5||

तू आहेस सर्वज्ञ, तुझ्या विना हलत नाही पान
म्हणतच तर लोक देतात तूला मान||6||

## 39.धरती

हिरवा शालु नेसुनी बसली धरती
निळे–नीळे आकाश आहे वरती।।ध्रु।।

धरती ही नटली सारी
पाने–फुले आणि वनस्पतीनी
बहरले तुझे मोहक रूप
पाहुण आनंद होतो मजला खुप।।1।।

जिव–जंतु मुक्त विचरती
वसुंधरेच्या अंगा वरती.
नदी–नाले खळ–खळ करती
सप्तसुरांच्या तालावरती।।2।।

श्रावणाच्या सरी कोसळती
न्हावुनी निघती सारी धरती.
हिरवळीची शाल पांघरूणी
नटूनी बसती सारी धरती.।।3।।

नवचैतन्याने हसती धरती
वनस्पतीना नवपालवी फुटती.
पशु–पक्षी ही कलरव करती
वसुंधरेच्या खा़ंद्यावरती.।।4।।

चला सुंदर बनवू धरती
वसुंधरेच्या प्रेमा वरती.
मिळनी लावु झाडे अनेक
धरतीचे ऋण मानुनी क्षणैक.।।5।।

## 40.मेघराजा

वाट पाहुण तुझी
पाणावले रे डोळे
कोरड्या पडल्या विहिरी
सुकले रे मळे ||1||

तु नको रे रूसु
वर्षाव कर गर्जुन
बळीराजा हताष झाला
तुझी वाट बघुन ||2||

तुझविन पिकं करपली
धरती सारी तरसली
जीव जंतुची झाली दैना
तुझ विन करमेना ||3||

तु खाऊ नको भाव
रोज घेतो तुझे नाव
तु घे आता धाव
कर आनंदाचा वर्षाव ||4||

तुझविन नाही अस्तीत्व
तु पाहु नको आता सत्व
तु सोड आपुले मी पनत्व
तुझ्यामुळेच आमुचे अस्तीत्व ||5||
नदी नाले जाऊदे वाहुन
आनंद होईल तुझे रूप पाहुन
बळीराजा मजेत गाईन
अन्न–धान्य घरी आपुल्या नेईन ||6||

## 41.बळीराजा

निसर्गाच कोप झालं
बळीराजा हतबल झाल||ध्रु||

पावसामुळे उभ्या पिकाच
अतोनात नुकसान झालं||1||

रात–दिन मेहनत करून
शेतकऱ्यान पिकवल होत सोन
निसर्गाच्या प्रकोपामुळे
दुखावली साऱ्यांची मन||2||

दिवाळी–दसरा आल तोंडावर
अन सावकाराच कर्ज डोक्यावर
पोट भरत होत शेतावर
आता जगु कोणत्या आशेवर||3||

निसर्गावरची शेती आमची
कधी ओला–कधी कोरडा दुष्काळ
केव्हा येणार नवीन सकाळ
फुटक आहे आमच कपाळ||4||

जगाच पोषिंदा आहे मी
उपाशी रहाण्याची आली वेळ
निसर्गाने खेळला माझ्याशी खेळ
तरी बसवीन मी जीवनात मेळ||5||

## 42.माझा शेतकरी

माझा शेतकरी देवा, माझा शेतकरी
उन–पावसामंदी, खपतो हा शेतामंदी
संसाराचं ओझ त्याच्या डोईवरी||1||

रात–दिन करतो हा अंग मेहनत,
राहुनिया उपासी–तपासी.
माझा शेतकरी, देवा! माझ शेतकरी||2||

पोटच्या पोरावानी जपतो हा पिकास
त्याचा झाला नाही अजून ही विकास
माझा शेतकरी देवा! माझा शेतकरी||3||

काळ्यामायेचा आहे, हा तर पूत्र
यांच्यामुळेच चालतो जगाचं रे सुत्र.
माझा शेतकरी देवा! माझा शेतकरी||4||

संकटात सापडला जगाचा हा पोशिंदा
त्याचा नाही कोणी रे वालिंदा.
माझा शेतकरी, देवा! माझा शेतकरी.||5||

कर्ज काढूनिया चालवितो हा संसार
याचा होत नाही सरकार पाशी विचार
माझा शेतकरी, देवा! माझ्या शेतकरी||6||

कर्ज उतरत नाही म्हणुन पितो हा विष.
केंव्हा येईल याच्या जिवनात सुख.
माझा शेतकरी, देवा माझा शेतकरी||7||.

## 43.जातीच भूत

जातीच भूत मानगुटीवर बसंल
जो तो स्वतःचेच वाजवत बसंल
जातीच्याया विळख्याने समाज घेरलं
माणुसकीचा गळा याने दाबून मारलं।।1।।

जो तो स्वतःला समजत श्रेष्ठ
याच्यामुळे होतो दुसऱ्याला कष्ट
शिकली सवरलेली देखील वागतात आडाणीपणे
त्यांचे नाही कुणाशी देणेघेणे।।2।।

मी आणि माझा यातच ते दंग
घेऊन चलारे सर्वांना तुम्ही संग
जातीने कुणी मोठा होत नसतो
कर्मानेच तो श्रेष्ठ बनत असतो।।3।।

अस्पृश्यता आहे समाजाचं कलंक
जातीयतेचा प्रश्न होतोय ज्वलंत
देऊ नकारे जातीयतेला खतपाणी
दुषीत करू नका तुमची वाणी।।4।।

मिटविण्यासाठी हयाला शाहू, फुले, आंबेडकरांनी
केला होता मोठा रे संघर्ष
घेऊन त्यांचं आज आदर्श
समाजात गाठूयात नवीन उत्कर्ष।।5।।

## 44.सैराट

चला रे चला पाहुया
परशाचा 'सैराट' पाहुया
झिंग–झिंग झिंगाट गाऊया
तालुक्याच्या गावाला जाऊया।।1।।

सैराट ने माजविलीय धमाल
यात पोरं करतीयात कमाल
बेधुंद होऊन पोहती तळ्यात
अन् पडती एकमेकांच्या गळ्यात।।2।।

सैराटची हिरोइन हाय अर्ची
चांगल्या–चांगल्यांना लावते मिर्ची
अर्ची करते खुप–खुप धमाल
परश्या बनतो बस स्टॅण्डवर हमाल।।3।।

प्रेमीयुगलाची आहे यात चर्चा
यावर झालाया खुपच खर्चा
सारी रेकॉर्ड यानी आहे तोडली
प्रेमापायी यांनी सारी दुनिया सोडली।।4।।

## 45.रंगपंचमी

सण हा रंगांचा
प्रितिचा अन उमंगाचा
होऊनी रंगानी चिंब
प्रकृतीचा पाड प्रतिबिब ||1||

लावु एकमेकांना रंग
खेळु रंगाच्या संग
लुटुया जीवनाचा आनंद
घेवु फुलाचा सुगंध||2||

नाच–गाण्यामध्ये
होऊनिया दंग
भिजवुया सारे
रंगांमध्ये अंग||3||

पाहुनी प्रकृतीची
मनमोहक अदा
खुश राहुयात
सारे सदा सर्वदा||4||

कृष्णाने राधाला
लावला होता रंग
रंगपंचमीने येऊदे
साऱ्यांमध्ये नवीन उमंग||5||

## 45.गुढ़ीपाडवा

गुढी पाडव्याला उभारूयात गुढी
आनंदाची, सुखाची आणि समृध्दीची
जपुनी नात भारतीय संस्कृतीशी
साजरा करण्यात पहाट नव वर्षाची||1||

सोडेतीन मुहुर्ता पैकी हा मुहुर्त
सारे शुभकाम करूयात तुर्त
गुढी उभारूनिया उंच आकाशी
स्नेह वाढवुयात सारे ऐकमेंकांशी||2||

धरूनी कास आधुनिकतेचे
स्वागत करू भारतीय संस्कृतीचे
नव्या वर्षाच्या नव्या पहाटेचे
प्रण घेवुयात सारे एकात्मतेचे||3||

विसरून सारे सुख–दुःख
पाहुयात नव्या वर्षाचे मुख
उराशी बाळगुन नवे ध्येय
मिळवुयात सर्व क्षेत्रात विजय||4||

आज खाऊयात गोड–धोड
करूयात विकृतीचा बिमोड
नव वर्ष साजरा करूयात
मोठ्या हर्ष आणि उत्साहात||5||

## 46.परिवर्तन

दूध गेल, चहा गेल
कोका कोला आल
वेस्टर्न कल्चरने
देशाच वाटोळ केल||1||

मॉम–डॅडच
जीवंतपनीच श्राध्द घातल
वेस्टर्न कल्चरने
देशाच वाटोळ केल||2||

फुगे फोडून, दिवे विझवुन
बर्थडे साजरे केल
वेस्टर्न कल्चरने
देशाच वाटोळ केल.||3||

पत्रावळ्याच्या पंगतीवरून
अन्न बफेवर आल
वेस्टर्न कल्चरने
देशाच वाटोळ केल.||4||

फॅशनच्या नावाखाली
फाटलेली कपडे घातले
वेस्टर्न कल्चरने
देशाच वाटोळ केल.||5||

साष्टांग नमस्काराच्या जागी
हाय–हॅलो आल.
वेस्टर्न कल्चरने

देशाच वाटोळ केल.||6||

सुगम संगिताच्या जागी
पॉप म्युझीक आल
वेस्टर्न क्लचरने
देशाच वाटोळ केल||7||

## 47.स्त्री

स्त्री ही देवी आहे ना दासी
ती जीवन जगण्याची अभिलाशी
सोशिल्या तिने अनंत यातना
तरी समाज देतो तिला कमीपणा।।1।।

शिक्षणाच्या जोरावर्ती तिने
बदलला आपुला इतिहास
समाज उडवितो तिचा उपहास
तरी निर्भीडपणे करते ती प्रवास।।2।।

स्त्री आहे समाजाचा आधार
तिचे सर्वावरती आहे उधार
वात्सल्य आणि करूनेची
ती मुर्ती सगुण साकार।।3।।

नवनिर्मितीची तिच्यात क्षमता
लोकलाजेने पाऊल घेते ती नमता
पुरूषाच्या खांद्याला खांदा लावून
जीवन जगते कुटुंबाला घेवुन।।4।।

अनंत आहेत रूपे तिची
साद आहे ती नव जीवनाची
करूया सारे तिचा सन्मान
तिच्यात जागेल स्व–स्वभिमान।।5।।

# 48.नव वर्षाची पूर्वसंध्या

सुख दुःखाची वळण घेत
सरल समंद वर्ष
नववर्षाच्या पूर्वसंध्येला
साजरा करूयात हर्ष||1||

निधुनिया गेला वर्ष
उरल्या फक्त आठवणी
कटू गोड अनुभवाची
करूया पूर्वसंध्येला चाचपणी||2||

झालं गेल गंगेला मिळालं
करूया आता नवी सुरूवात
नव वर्षाची नवी पहाट
बघत आहे सर्वांची वाट||3||

नववर्ष घेवुन येईल
सर्वामध्ये नवी उमेद
एक दुसऱ्याची काळजी घेत
क्रूयात एक दुसऱ्याची मदत||4||
नैसर्गिक आपत्ती मध्ये
देऊनी शासनाला साथ
नववर्षाच्या पूर्वसंध्येला
राहु आप आपल्या घरात||5||
करू नववर्ष साजरा
वेगळ्याच दिमाखात
तरच येईल समाजात
नववर्षाची नवी पहाट||6||

# 49.चिमणी

लुप्त झाली चिमणी
लुप्त झाला चिवचिवाट
4 जी, 5 जी च्या नेटवर्कने
लावली चिमण्यांची विल्हेवाट।।1।।

एके काळी घरासमोर
जमायचा चिमण्याचा थवा
सांडलेल्या अन्न कणासाठी
व्हायचा त्याच्यात चिवचिवाट।।2।।

जीव हिचा इवलासा
पण काम मोठ करते
काडी–कचरा वेचून
घरट आपल विणते।।3।।

अंगणामध्ये चिमणी पाहुण
आई बाळाला चिऊचा घास भरवते
आधुनिक तंत्रज्ञानाच्या शोधाने
बिचाऱ्या चिमणीचे जीव जाते।।4।।

पर्यावरणाच समतोल राखण्यात
हिचा मोठा आहे वाटा
तर चला सारे शोधुयात
चिमणीच्या संवर्धनाच्या वाटा।।5।।

# 50.कविता

भावनांचा सागर कविता
विचारांचा जागर कविता
कविची साधना कविता
कविची कल्पना कविता||1||

शब्दाचा खेळ कविता
रसिकांचा मेळ कविता
परिवर्तनाच साधन कविता
सुख–दुखाच बंधन कविता||2||

ईष्वराच वंदन कविता
मुक्त मनाच स्पंदन कविता
विद्रोहाच स्फोट कविता
कविच पोट कविता||3||

कल्पनाच जाळ कविता
समाजाच नाळ कविता
पुस्तकाच पान कविता
देशाच मान कविता||4||

कविचा स्वाभिमान कविता
रसीकाचा अभिमान कविता
जाग्रतीची दिशा कविता
प्रगतीची आशा कविता||5||

## 51.जीवन

सुख–दुःखाच संगम जीवन
नात जपल्याने बनत पावन
परिस्थितीच्या प्रभावाने
बनत आणि बिघडत जीवन।।1।।

जीवनात वळण अनेक येतात
वादळ वारे पण झनझावतात
परिस्थितिचा सामना जे करतात
तेच जीवनाचा भवसागर तरतात।।2।।

इच्छा आणि आकांक्षेच्या व्युहात
जीवनाची नौका हुल कावे खाते
दृढ इच्छा शक्तीच्या जोरावर
भवसागर ही आरामात तरते।।3।।

आनंददायी जीवनासाठी हवे
शांती आणि समाधानाचे अस्त्र
दुःखात चेहऱ्यावर हवे हास्य
हेच आहे सुखी जीवनाचे रहस्य।।4।।

राहुया मिळून मिसळून सर्वांसंगे
अनुभवुयात नात्यांची मधुर तरंगे
एक दुसऱ्याला मदतीचा हात देत
करूयात सुखी जीवनाची सुरूवात।।5।।

## 52.परिवार

जीवनामध्ये जो आणतो बहार
तो म्हणजे आपला परिवार
सुख दुखामध्ये देतो तो साथ
करीत नाही एकमेकांशी घात||1||

एकमेकांसाठी चंदनासम तो झिझतो
सुखामध्ये त्याचा सुगंध दरवळतो.
संकट समयी ढाल तो बनतो
परिस्थितिचा एकीने सामना तो करतो||2||

जीवाला जीव हा देतो
दुःखाचे घाव हा भरतो
प्रत्येकाशी नात हा जपतो
सुखामध्ये रममाण हा होतो||3||

नाव आहे याचं परिवार
याच्या मुळे बहरतो घरबार
यामुळे नावारूपास येतो व्यक्ती
दाखवितो सर्वांना एकतेची शक्ती||4|

रहावे सर्वांनी परिवाराशी जुडुन
संकटे पळतील रस्ता सोडून
माणसं माणसाशी यात जुडतात
भारतीय संस्कृतीचे दर्शन ही घडतात||5||

## 53.सावित्री

एकीने वाचविला पतीचा प्राण
एकीने शिक्षणासाठी घेतली अंगावर घाण
दोन्ही आहेत काळानुसार महान
म्हणूनच जग करत त्याना प्रणाम||1||

दोघामध्ये होती मोठी चिकाटी
जिंकली त्यानी काळाची कसोटी
दोन्ही होत्या पती पारायण
त्याग पाहून त्यांचा भरून येती नयन||2||

जनमानसाच्या मनावर ते राज्य करतात
त्यांच्या नावानेच महिला आज तरतात
स्त्रियांच्या अस्मितेला त्यानी जागविले
आपल्या साधनेने दैवाला पण नमविले||3||

स्त्री शक्तीचा केला त्यानी प्रचार
शुध्द होते त्यांचे आचार आणि विचार
हिमतीच्या जोरावर जीवन त्या जगल्या
भारतीय संस्कृतीचे प्रतीक त्या बनल्या||4||

समाजामध्ये करूनी परिवर्तन
घडवू सर्वांना भारताचे दर्शन
करू दोघींचा गुण गाण
वाढवू स्त्री शक्तीचा मान||5||

# कवी परिचय



**नाम : आनंद हिरालाल जाधव**

**जन्म :** 31/08/1985

**जन्मस्थान :**घाटबोरोळ (सेवानगर तांडा) ता. हुमनाबाद जि. बिदर (कर्नाटक)

**शिक्षा :** एम.ए. बी.एड्. एम. फिल (हिंदी)

**कार्यक्षेत्र :** सहशिक्षक (GPT) जी.एच.पी.एस. कोटमाळ

ता. बसवकल्याण जि. बिदर (कर्नाटक)

**पता :** लक्ष्मी निवास, विजयनगर कॉलोनी, बसवकल्याण

ता. बसवकल्याण जि. बिदर (कर्नाटक)

पिन कोड नं. 585327

**मोबाईल नं. :8618401340, 9535503233**

**लेखन कार्य :–**

**हिंदी कविता संग्रह**–प्रयास,

**शोध**–संत सेवालाल दर्शन,

**मराठी कविता संग्रह**–साहित्य साधना

## कवी परिचय



आनंद जाधव

**नाम :** आनंद हिरालाल जाधव

**जन्म :** 31 / 08 / 1985

**जन्मस्थान :**घाटबोरोळ (सेवानगर तांडा)

ता. हुमनाबाद जि. बिदर (कर्नाटक)

**शिक्षण :** एम.ए. बी.एड्. एम. फिल (हिंदी)

**कार्यक्षेत्र :** सहशिक्षक (GPT) जी.एच.पी.एस. कोटमाळ ता. बसवकल्याण जि. बिदर (कर्नाटक)

**पत्ता :** लक्ष्मी निवास, विजयनगर कॉलोनी, बसवकल्याण

ता. बसवकल्याण जि. बिदर (कर्नाटक)

पिन कोड नं. 585327

**मोबाईल नं. :8618401340, 9535503233**

लेखन कार्य :–

**हिंदी कविता संग्रह**–प्रयास,

**शोध**–संत सेवालाल दर्शन,

**मराठी कविता संग्रह**–साहित्य साधना



नवसाहित्यकार प्रकाशन,नांदेड

www.navsahitykarpublication.com

Mo.9405384672

ISBN- 978-81-956110-1-0




साहित्य साधना

आनंद जाधव